**मुंबई बाजार समितीच्या कार्यक्षेत्रामध्ये महानगरपालिका किंवा पणन संचालनालय, यांचेकडून अनुज्ञप्ति देण्यात आलेली नाही ते अनधिकृत घाऊक बाजार बंद करण्याकरिता समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- कृबास-२०२२/प्र.क्र.८४/११-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १० मार्च ,२०२२

**प्रस्तावना :-**

मा.मंत्री (गृह) व मा.मंत्री (पणन) यांच्या अध्यक्षतेखाली दि.२५.०१.२०२२ रोजी, मा.मंत्री (गृह) महोदयांचे दालन क्र.५०७, (विस्तार इमारत) मंत्रालय, मुंबई येथे मुंबई बाजार समितीच्या कार्यक्षेत्रामध्ये अनधिकृतपणे चालू असलेल्या फळ,भाजीपाला, कांदा-बटाटा व्यवसाय बंद करण्याबाबत तसेच खाजगी कोल्डस्टोअरेज मधून चाललेल्या अनधिकृत फळ विक्री व्यवसाय या विषयाबाबत बैठक आयोजित करण्यात आली होती. त्यामध्ये मुंबई, नवी मुंबई कार्यक्षेत्रातील अनधिकृत बाजार बंद करणेकरिता ज्या बाजारांना महानगरपालिका किंवा पणन संचालनालय, यांचेकडून अनुज्ञप्ति देण्यात आलेली नाही ते अनधिकृत घाऊक बाजार बंद करणे बाबत मुंबई कृषि उत्पन्न बाजार समितीने संबंधीत महानगरपालिका व पोलीस यंत्रणा यांना कळवून असे अनधिकृत बाजार बंद करण्याची कार्यवाही करावी. या संदर्भात समित्यांचे गठण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुंबई बाजार समितीच्या कार्यक्षेत्रामध्ये ज्या बाजारांना महानगरपालिका किंवा पणन संचालनालय, यांचेकडून अनुज्ञप्ति देण्यात आलेली नाही ते अनधिकृत घाऊक बाजार बंद करणे बाबत मुंबई कृषि उत्पन्न बाजार समितीने संबंधीत महानगरपालिका व पोलीस यंत्रणा यांना कळवून असे अनधिकृत बाजार बंद करण्यासाठीत खालीलप्रमाणे दोन समित्यांचे गठण करण्यात येत आहे. या समितीची रचना खालीलप्रमाणे राहील :-

**अ) आढावा समिती**

| | |
|---|---|
| १.मा.मंत्री महोदय, (सहकार व पणन) | अध्यक्ष |
| २.मा.श्री.शशिकांत शिंदे ( वि.प.स ) | सदस्य |
| ३.मा.अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) | सदस्य |
| ४.मुंबई महानगरपालिका आयुक्त | सदस्य |
| ५.नवी मुंबई महानगरपालिका आयुक्त | सदस्य |
| ६.कामगार आयुक्त महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |

| | |
|---|---|
| ७.पोलीस आयुक्त, मुंबई व नवी मुंबई | सदस्य |
| ८.पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ९.सभापती, मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, पुणे | सदस्य |
| १०.सचिव, कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई | सदस्य सचिव |

**ब) अंमलबजावणी समिती**

| | |
|---|---|
| १.सचिव, मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई | अध्यक्ष |
| २.विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, मुंबई व कोकण | सदस्य |
| ३.उप आयुक्त, अतिक्रमण विभाग,म.न.पा मुंबई व नवी मुंबई | सदस्य |
| ४.उप आयुक्त, बाजार विभाग, म.न.पा मुंबई व नवी मुंबई | सदस्य |
| ५.पोलीस आयुक्तालय, मुंबई व नवी मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ६.व्यापारी असोसिएशन यांचे प्रतिनिधी (मुंबई कृ.उ.बा.स. चे सल्याने) | सदस्य |
| ७.हमाल/माथाडी संघटना यांचे प्रतिनिधी (मुंबई कृ.उ.बा.स. चे सल्याने) | सदस्य |
| ८.सहसचिव, मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई | सदस्य सचिव |

२. उक्त आढावा समितीने वेळोवेळी बैठक आयोजित करुन शासनास अहवाल सादर करावा. सदर अहवाल प्राप्त झाल्यानंतर पुढील आवश्यक कार्यवाही करिता अंमलबजावणी समिती कडे पाठविण्यात येईल. त्यानुसार आवश्यक कार्यवाही करुन अंमलबजावणी समितीने अहवाल शासनास एक महिन्यात सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१०१७३७५७३८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2022.03.10 17:38:48 +05'30'

**(सुग्रिव. सं. धपाटे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री महोदय, (सहकार व पणन) यांचे खाजगी सचिव
२) मा.श्री.शशिकांत शिंदे ( वि.प.स )
३) मा.अपर मुख्य सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, मुंबई महानगरपालिका

५) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका
६) कामगार आयुक्त महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) पोलीस आयुक्त, बृन्हमुंबई / नवी मुंबई
८) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) सभापती, मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, पुणे
१०) सचिव, कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई
११) विभागीय सहनिबंधक,सहकारी संस्था, मुंबई व कोकण
१२) उप आयुक्त, अतिक्रमण विभाग,म.न.पा मुंबई / नवी मुंबई
१३) उप आयुक्त, बाजार विभाग,म.न.पा मुंबई / नवी मुंबई
१४) पोलीस आयुक्तालय, मुंबई / नवी मुंबई यांचे प्रतिनिधी
१५) व्यापारी असोसिएशन यांचे प्रतिनिधी
१६) हमाल/माथाडी संघटना यांचे प्रतिनिधी
१७) सहसचिव, मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई
१८) कार्यासन १-स/१०स/२१-स/२४-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) निवड नस्ती (११-स).